**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम**

आर्थिक वर्ष २०१५-१६ साठी राज्य हिश्श्यांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी अनुदाने **(लेखाशिर्ष २२१५ २०८२)**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** राग्रापे २०१५/प्र.क्र.५१/पापु-१०

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,

लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.

तारीख: २२ जून, २०१५

वाचा

१) **शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई, क्रमांकः** ग्रापाधो-१११४/ प्र.क्र. ५२/पापु-०७, दि.१७ ऑक्टोबर, २०१४

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत आर्थिक वर्ष २०१५-१६ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(०१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना- देखभाल व दुरुस्ती यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०८२) या राज्य हिश्श्याच्या लेखाशिर्षाखाली देखभाल व दुरुस्तीसाठी अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

आर्थिक वर्ष २०१५-१६ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल व दुरुस्तीकरीता लेखाशिर्ष २२१५ २०८२ खाली उपलब्ध असलेला रु. २३.५२ कोटी (रुपये तेवीस कोटी, बावन्न लाख फक्त) एवढा निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना अर्थसंकल्प प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी :-**

१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या कव्हरेज व गुणवत्ताबाधीत गावे/वाडयांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/वाडयांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे, अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचे आहे.

२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणने कार्यासन पापु-१० / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे.

त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार देखभाल व दुरुस्ती याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

५) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता, IMIS या प्रणालीवर घेण्यात येऊन सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात.

६) सदर निधी सन २०११-१२, २०१२-१३, २०१३-१४, व २०१४-१५ या वर्षांच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

७) उपरोक्त निधी संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/अर्थ-३, दि. १७/०४/२०१५ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. २३.५२ कोटी (रुपये तेवीस कोटी, बावन्न लाख फक्त) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक, (वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. शां.सि.कुदळे) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक, (वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच व उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. शां.सि.कुदळे) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकर, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०१-पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(०१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना- देखभाल व दुरुस्ती यासाठी अनुदान, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०८२) या राज्य हिश्श्याच्या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१५-१६ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी तात्काळ आहरीत करुन घ्यावा.

**५. " हा शासन निर्णय वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३०३/व्यय-३, दि. ११/०६/२०१५ अनुसार त्या विभागांनी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे."**

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक २०१५०३३११२१६५७०८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shirish Vasant Godbole

Digitally signed by Shirish Vasant Godbole
DN: CN = Shirish Vasant Godbole, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section officer
Date: 2015.06.22 12:19:52 +05'30'

( शि. व. गोडबोले )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
नियोजन विभाग (कार्यासन १४४३) / वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
संबंधित विभागीय आयुक्त,
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पापु-०७, पा.पु.२०.
निवडनस्ती पापु-१० कार्यासन.